GR-2001,0805\7225001-1201

**जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या उपकर वाढीच्या प्रस्तावांना मंजूरी देण्याचे अधिकार विभागीय आयुक्तांना देण्यासाठी महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियमात केलेली सुधारणा.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक एसएफसी-२०००/प्र.क्र.३७०८/२४ (वित्त-३)**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- २१ नोव्हेंबर, २००३.**

**शासन परिपत्रक**

जिल्हा परिषदांना जमिन महसूल उपकर व मुद्रांक शुल्क अनुदान थेट उपलब्ध करुन देणे व जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या उपकर वाढीच्या प्रस्तावांना मंजूरी देण्याचे अधिकार विभागीय आयुक्तांना देण्यासाठी म.जि.प.व पं.स. अधिनियम १९६१ मधील संबंधि कलमांना सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्र शासन राजपत्रात दि.११ ऑगस्ट, २००३ रोजी प्र प्रसिध्द केलेला अधिनियम क्र.२९ ची प्रत [redacted] दि. १२ सप्टेंबर २००३ च्या पृष्ठांकनाद्वारे आपणास पाठविण्यात आलेली आहे.

२. जिल्हा परिषद व पंचायत समिती यांचे उपकर वाढीचे, जिल्हा परिषद अधिनियम, १९६१ मधील कलम १५५ अन्वये सादर होणारे सर्व प्रस्ताव यापुढे मंजूरीसाठी राज्य शासनाकडे न पाठविता संबंधित विभागीय आयुक्तांकडे पाठविण्याचे आहेत. सद्यस्थितीत मंजूर प्रस्तावांची यादी यासोबत विवरणपत्र-१ येथे जोडण्यात येत आहे. सदर यादीमध्ये उपकर वाढीचे दर तसेच कालावधी नमूद केला आहे. त्यानुसार यापुढील योग्य ती कारवाई जिल्हा परिषद व विभागीय आयुक्त यांनी करावयाची आहे. ज्या जिल्हा परिषदांनी ५०० पैसे पर्यन्त उपकर वाढीचा निर्णय अद्याप घेतला नाही, त्यांनीही त्याबाबत लवकर निर्णय घेणे जिल्हा परिषदेला उत्पन्न वाढीच्या दृष्टीने हिताचे आहे.

३. या विभागाचे परिपत्रक क्र.एलएफसी २००१/प्र.क्र.४०९६/२८, दि.२५.९.२००२ अन्वये मंजूरीसाठीचे प्रस्ताव परिपत्रकात नमूद कालावधीत पाठविणे विभागीय आयुक्तांकडे पाठविणे जरुरी आहे (प्रत सोबत). प्रस्तावांना मान्यता, ठरावानुसार अंमलबजावणीच्या कालावधी सुरु होण्यापूर्वी देणे गरजेचे आहे. यासाठी जिल्हा परिषद व विभागीय आयुक्त कार्यालयाने योग्य ती सर्व दक्षता घेणे जरुरीचे आहे. जेणेकरुन जिल्हा परिषदेचे आर्थिक नुकसान होणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( एस.एस.हुरीन )
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. विभागीय आयुक्त, सर्व.
२. जिल्हाधिकारी, सर्व.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
४. उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) (सोबत अधिसूचनेची प्रत जोडली आहे)
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
६. कार्यासन अधिकारी, (ल-५) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासन अधिकारी, (व्यय १५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.वित्त १, ७ व ८ ग्रा. वि.व ज.सं.वि.मंत्रालय, मुंबई.
९. समन्वय कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती कार्यासन क्र. वित्त ३ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सहसंचालक लेखा, विभागीय आयुक्तांचे कार्यालय, सर्व.